एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमाकरिता आर्थिक वर्ष सन २०२२-२३ साठी यशदा, पुणे या संस्थेस अनुदान वितरित करण्याबाबत.
(वेतनेतर १ ला हफ्ता)

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक. बीयुडी-२०२२/प्र.क्र.२४/सीपीटीपी-अ**
**मंत्रालय, मुंबई**
**दिनांक- १९/०५/२०२२**

वाचा :-१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्रमांक-टिआरएन-२०१३/प्र.क्र.८४ /१३/१२-अ, दिनांक २०/०१/२०१४
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्रमांक. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४/०४/२०२२
३) यशदा, पुणे यांचे पत्र क्र.जा.क्रमांकसीपीटीपी प्रशासन/१२५/०९/२१/११८७, दिनांक ०६/०४/२०२२

**प्रस्तावना :-**

सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि. २०/०१/२०१४ नुसार शासन सेवेमध्ये सरळसेवेने नियुक्ती हाणाऱ्या गट-अ व गट-ब संवर्गातील अधिकांऱ्यासाठी एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्यात येत असून प्रशिक्षणासाठी प्रति दिन प्रति प्रशिक्षणार्थी उपलब्ध करुन दयावयाचा निधी सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दिनांक .०८/०८/२०१४ अन्वये निश्चित करण्यात आला आहे. त्यानुसार एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-७ या तुकडीच्या प्रशिक्षणासाठी पायाभूत प्रशिक्षणासाठी सन २०२२-२३या अर्थसंकल्पीय वर्षात यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा) या संस्थेस आवश्यक असलेला निधी रु. ४४,८०,०००/- इतका निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

राज्यसेवा परीक्षा-२०१९ अन्वये शिफारस झालेल्या उमेदवारांचे प्रशिक्षण दिनांक १७/०१/२०२२ पासून सुरु करण्यात आले असून त्यांना जिल्हा संलग्नतेच्या टप्प्यावर संबंधित प्रशासकीय विभागांकडे रुजू करुन घेण्यात आले होते.सदर चार आठवडयांचा टप्पा पूर्ण झाल्यानंतर आता प्रशिक्षणार्थींना दिनांक १४/०२/२०२२ पासून पायाभूत प्रशिक्षणासाठी (०८ आठवडे) यशदा, पुणे या प्रशिक्षण संस्थेत रुजू करुन घेण्यात आले आहे. याअनुषंगाने सदर प्रशिक्षणासाठी दिनांक१४/०२/२०२२ ते दिनांक ३१/०३/२०२२ या ४६ दिवसांकरिता रु. ३५००/- प्रति दिन/ प्रति प्रशिक्षणार्थी (४६ दिवस*१२८ प्रशिक्षणार्थी*रु.३५००/-) असे एकूण रु. २,०६,०८,०००/- (रुपये दोन कोटी सहा लाख आठ हजार फक्त) इतक्या खर्चाची प्रतिपूर्ती यशदा, पुणे यांना शासन निर्णय, दिनांक

२४/०३/२०२२ अन्वये वितरित करण्यात आले आहे.  पायाभूत प्रशिक्षणाचा उर्वरित १० दिवसांच्या खर्चाची प्रतिपूर्ती करण्याबाबत यशदा, पुणे यांनी संदर्भ क्र. ३ येथील पत्रान्वये मागणी केली आहे.

२.   त्यानुसार सदर शासन निर्णयान्वये यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे या संस्थेस “लेखाशीर्ष-ए-४, २०७० इतर प्रशासकीय सेवा ००-००३ प्रशिक्षण (००)(१२) यशदा, पुणे या संस्थेस एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमासाठी सहायक अनुदान (२०७०००८७१) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)” या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२०२३ या आर्थिक वर्षात **रु.४४,८०,०००/-(रुपये चव्वेचाळीस लाख ऐंशी हजार फक्त)** इतका निधी वितरित करण्यास पुढील अटी व शर्तीच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे.

अ) यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा) पुणे या संस्थेने खर्च वितरित अनुदानाच्या मर्यादेत ठेवावा व प्रत्यक्ष झालेल्या खर्चाइतकीच देयके कोषागारातून आहरित करण्याची दक्षता घ्यावी.

आ) प्रत्यक्ष झालेल्या खर्चाइतकी देयके कोषागारात सादर करुन रक्कम आहरित केल्यानंतर आहरित केलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शीर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी  व त्याबाबतचे प्रमाणपत्र १५ दिवसांच्या आत शासनास सादर करावे.

इ) सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात केलेल्या खर्चाचा खर्च ताळमेळ करण्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित नियंत्रक अधिकारी तसेच आहरण व संवितरण अधिकारी यांची राहील.

ई) यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे या संस्थेने वितरित करण्यात आलेल्या अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र (UTILIZATION CERTIFICATE) महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर व शासनाला सादर करावे.

उ) यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे या संस्थेने उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके ठेवण्यात यावीत. सदर लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर यांना राहतील व त्याकरिता यशदा, पुणे त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

ऊ) वित्त विभागाच्या दि. ०४/०४/२०२२ च्या शासन निर्णयातील नमूद अटी/ शर्तींचे पालन करुन सदर निधी खर्च करण्यात यावा.

३.  यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे या संस्थेचे आहरण व संवितरण अधिकारी यांनी संस्थेस वितरित करण्यात येत असलेल्या अनुदानाची रक्कम **रु.४४,८०,०००/-(रुपये चव्वेचाळीस लाख ऐंशी हजार फक्त)** आहरित करावी.

४.  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०५१९१०५२३७११०७ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anuradha
Kakasaheb
Khanvilkar

Digitally signed by Anuradha Kakasaheb Khanvilkar
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e2fed57d20a51362449278a4aa952427fd085043a65380ece8ec8bac6c4d7d01, serialNumber=3ecf6c53ebd134b34c3b971e3e05a22ee965bf6c82771b162ccce09b22f3cb68, cn=Anuradha Kakasaheb Khanvilkar
Date: 2022.05.19 14:53:26 +05'30'

**(अ.का. खानविलकर)**
**उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग**

**प्रति,**

१. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
२. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
३. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे
४. लेखाधिकारी, यशदा, पुणे (३ जादा प्रतीसह)
५. जिल्हा कोषागार कार्यालय, पुणे
६. वित्त विभाग (व्यय-४/ अर्थसंकल्प-१४), मंत्रालय, मुंबई
७. अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन-२५, मुंबई-३२
८. निवडनस्ती